**कर्तव्यात कसूर करणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यावर कारवाई करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन परिपत्रक क्रमांक : संकिर्ण-२०१८/प्र.क्र.१०१/सेवा-४अ

गो.ते.रुग्णालय आवार, संकुल इमारत, १० मजला
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई.
दिनांक : १ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना** -

औरंगाबाद जिल्ह्यातील प्राथमिक आरोग्य केंद्रात औषधाचा तुटवडा जाणवत असल्यासंदर्भात दिलेल्या सूचनेबाबत दि.१६.०७.२०१८ रोजी विधान परिषदेत, विधान परिषद नियम ९३ अन्वये चर्चा झाली. सदर चर्चेत आरोग्य केंद्रात वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या गैरहजेरीमुळे उपचाराअभावी रुग्णाचा मृत्यू होत असल्याच्या उपस्थित झालेल्या मुद्यानुषंगाने "ज्या आरोग्य केंद्रात कर्तव्यावरील/ ड्युटीवरील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या गैरहजेरीमुळे उपचाराअभावी रुग्णाचा व प्रसुती दरम्यान मातेचा मृत्यू झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधीत वैद्यकीय अधिकाऱ्यास तात्काळ निलंबित करुन एम.एम.सी. कडे नोंदणी रद्द करण्यासाठी शिफारस करण्यात येईल तसेच पूर्वपरवानगी/ सबळ कारणा शिवाय कर्तव्यात कसूर करणाऱ्या म्हणजेच ड्युटीवर हजर न राहणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यावर त्वरीत कारवाई (वेतनवाढ रोखीची शिक्षा) करण्यात येईल" अशी विधिमंडळात घोषणा केली आहे. सदर बाब लक्षात घेता शासन याव्दारे पुढीलप्रमाणे सूचना देत आहे.

**परिपत्रक** -

शासकीय आरोग्य केंद्र/ रुग्णालय कर्तव्यावर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्याच्या विना परवानगी गैरहजेरीमुळे उपचाराअभावी रुग्णाचा वा प्रसुती दरम्यान मातेचा/बाळाचा मृत्यू झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधीत वैद्यकीय अधिकाऱ्यास तात्काळ निलंबित करण्यात येऊन महाराष्ट्र वैद्यकीय परिषदेकडे (M.M.C.) कडे त्याची नोंदणी रद्द करण्यासाठी शिफारस करण्यात येईल. तसेच पूर्वपरवानगी अथवा सबळ कारणाशिवाय कर्तव्यावर गैरहजर राहणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यावर नियमानुसार शिस्तभंगविषयक कारवाई करुन त्याची वेतनवाढ रोखण्यात येईल.

२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांना कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त बाब त्यांच्या अधिपत्याखालील सर्व संबंधीतांच्या निदर्शनास आणावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१८०९०११११६५५३८१७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Harishchandra Dhabade

Digitally signed by Kiran Harishchandra Dhabade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=63d2135cee8a94b4f96222ed054d19f05ae9a39d43616d1b9a54dfbe721bce71, cn=Kiran Harishchandra Dhabade
Date: 2018.09.01 14:28:37 +05'30'

**( किरण धबडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

मा.मंत्री (सा.आ. व कु.क.) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (सा.आ. व कु.क.) यांचे खाजगी सचिव.
प्रधान सचिव (सा.आ.), मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, मुंबई/पुणे/ नाशिक/ कोल्हापूर/ अकोला/ नागपूर/ लातूर/ औरंगाबाद.
कार्यासन सेवा-४/सेवा-४ब, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन सेवा-४अ संग्रहार्थ.